**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंअंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत..**
**दिवंगत शुभांगी पुरुषोत्तम आठवले, महसूल सहायक**




**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग, मंत्रालय (मुख्य इमारत), १ ला मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्र ०२२-२२७९३६२७. Email ID : vikram.nikam@nic.in


---

**क्रमांक : अनुदान २०२१/प्र.क्र.११२ /ई-७** **दिनांक :- ३१ मार्च, २०२२**

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :- अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९.०९.२०१८.
२. जिल्हाधिकारी, पालघर यांच्याकडुन प्राप्त झालेला क्र.महसूल/लेखा/क-१/टे-१/कावि-८५/२०२१, दि.०८.०४.२०२१ व दि.२७.१२.२०२१ रोजीचा सानुग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव.
३. कै.शुभांगी पुरुषोत्तम आठवले यांचे कायदेशीर वारसदार श्री.पुरुषोत्तम शामराव आठवले यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरिता प्राप्त झालेला दि.०७.१२.२०२१ रोजीचा अर्ज.

## <u>आदेश</u>

उपरोक्त क्रमांक २ अन्वये जिल्हाधिकारी, पालघर यांच्याकडुन प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्री.पुरुषोत्तम शामराव आठवले यांच्या उपरोक्त क्र.३ येथे नमुद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, कै.शुभांगी पुरुषोत्तम आठवले, महसूल सहायक यांचे कायदेशीर वारसदार श्री.पुरुषोत्तम शामराव आठवले ( वडील ) व श्रीम.शोभा पुरुषोत्तम आठवले (आई) यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- ( अक्षरी रुपये दहा लाख फक्त ) मंजुर करीत आहेत.

सदर " सानुग्रह अनुदान " शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्षे शासन सेवा होण्यापूर्वी दिनांक २२.१२.२०२० रोजी मृत्यु पावल्यामुळे मंजुर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासुन १ वर्षे कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदरचा खर्च " मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी, १०३, अनुकंपा भत्ते, (००)(०६)- परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०३३११०५५०७१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

SANJAY BANKAR


Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2022.03.31 10:56:42 +05'30'


**( संजय बनकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर
२. तहसीलदार, वाडा जि.पालघर
३. जिल्हा कोषागार कार्यालय, पालघर
४. उप कोषागार कार्यालय, वाडा जि.पालघर
५. श्री.पुरुषोत्तम शामराव आठवले व श्रीम.शोभा पुरुषोत्तम आठवले, रा.राहुलनगर, बिच्छु टेकडी कॅम्प, अमरावती ( तहसीलदार, वाडा जि.पालघर यांच्यामार्फत )
६. निवडनस्ती ( ई-७ ).